**व्हि.सी.यंत्रणा कार्यान्वित करण्यासंदर्भातील आयटीआय लि. कंपनीचे थकीत देयकाची रक्कम अदा करण्याबाबत निर्णय घेण्याकरिता समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ई-गव्ह १४१६/प्र.क्र.०६ /संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ एप्रिल, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.संकीर्ण २४११ / ( ५८ / ११ ) / अर्थसंकल्प, दिनांक २५.०३.२०११

२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.संकीर्ण २४११ / ( ५८ / ११ ) / अर्थसंकल्प, दिनांक २१.१०.२०११

**प्रस्तावना :-**

शिक्षण विभाग व शिक्षण विभागाच्या अखत्यारितील क्षेत्रिय कार्यालय यांना जोडण्यासाठी व्हिडिओ कॉन्फरिसिंग सेवा पहिल्या टप्प्यात ४५८ ठिकाणी तर दुसऱ्या टप्प्यात १२० ठिकाणी उपलब्ध करुन देण्याचा निर्णय विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ व २ वरील शासन निर्णयान्वये घेण्यात आला होता. सदर केद्रांपैकी सदयस्थितीत ९७ केंद्रे बंद आहेत. सदर केंद्रे सुरु करण्यासाठी आयटीआय लि. या केंद्र शासनाच्या सार्वजनिक उपक्रम कंपनीशी झालेल्या करारानुसार कंपनीचे रुपये ३.४१ कोटी इतकी रक्कम थकित आहे. सदर थकीत रक्कम अदा करण्यासाठी निर्णय घेण्याकरिता दि.२९.०३.२०१७ रोजी मा.मंत्री ( शा.शि.) यांच्याकडे झालेल्या बैठकीत प्रधान सचिव (शा.शि.व क्री.) यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करावी, असे निर्देश देण्यात आलेले आहेत. त्यानुसार समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शिक्षण विभाग व शिक्षण विभागाच्या अखत्यारितील क्षेत्रिय कार्यालय यांना जोडण्यासाठी उभारण्यात आलेली व सदयस्थितीत बंद असलेली व्हि.सी.यंत्रणेची ९७ केंद्रे कार्यान्वित करण्यासाठी आयटीआय लि. या केंद्र शासनाच्या सार्वजनिक उपक्रम कंपनीशी झालेल्या करारानुसार कंपनीचे थकित रुपये ३.४१ कोटी अदा करण्यासाठी निर्णय घेण्याकरिता प्रधान सचिव (शा.शि. व क्री.) यांचे अध्यक्षतेखाली खालिलप्रमाणे समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, शा.शि.व क्री.विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | संचालक, माहिती व तंत्रज्ञान, मुंबई | सदस्य |
| ३ | संचालक, विदया प्राधिकरण, पुणे | सदस्य |
| ४ | उपसचिव ( संगणक ), शा.शि.व क्री.विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

२. उपरोक्त समितीने व्हि.सी.यंत्रणा कार्यान्वित करण्यासंदर्भात करण्यात आलेल्या कार्यवाही बाबतचा तसेच प्रस्तूत प्रकरणी झालेल्या अनियमिततेबाबत सखोल अभ्यास करुन आयटीआय लि. कंपनीचे थकीत देयकाची रक्कम अदा करण्याबाबत निर्णय घेण्याकरिता आपला सविस्तर व स्वयंस्पष्ट अहवाल १५ दिवसात शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०४०७१५३५३४५१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2017.04.07 15:36:54 +05'30'

**(चारुशीला चौधरी)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मंत्री ( शालेय शिक्षण ) यांचे स्वीय सहायक
२. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. संचालक, माहिती व तंत्रज्ञान, मुंबई
४. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक / प्राथमिक / निरंतर शिक्षण ), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक, विद्या प्राधिकरण, पुणे
६. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे
७. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे
८. संचालक, राज्य शैक्षणिक तंत्रज्ञान संस्था ( बालचित्रवाणी ), पुणे
९. प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई
१०. संग्रहार्थ (संगणक कक्ष)

********